“श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” विकास आराखडयास निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.५/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३१ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.०५/का.१४४४,
दि. २८ फेब्रुवारी, २०१८.

प्रस्तावना :-

“श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” विकास आराखड्यास दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, रु.१४८.३७ कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखड्याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी जिल्हाधिकारी, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

“श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” विकास आराखड्यास खालील बाबींसाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना रु.१५.४० कोटी (रुपये पंधरा कोटी चाळीस लक्ष फक्त) निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे.:-

| मुख्य लेखाशिर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद | ७०% च्या मर्यादेत वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| ५४५२ (पर्यटनावरील भांडवली खर्च) ५४५२०१५१ | ५३ मोठी बांधकामे | रु. २२.०० कोटी | रु. १५.४० कोटी |
| **एकुण** | | **रु. २२.०० कोटी** | **रु. १५.४० कोटी** |

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ओ-१०, मुख्य लेखाशिर्ष ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्र, (००) (०९) “श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” (५४५२ ०१५१) कार्यक्रम (दत्तमत)” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत करण्यात येणा-या विकास कामांकरीता आवश्यकतेनुसार भूसंपादन प्रक्रिया वेळेवर पूर्ण न करता विकास कामे सुरू करण्यात आली असल्याने अशी विकास कामे नियोजित वेळेत पूर्ण करणे शक्य झालेली नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच भूसंपादनास विलंब झाल्यास जमीनीच्या किंमतीमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ होते. परिणामी तीर्थक्षेत्र विकास आराखड्याच्या संपूर्ण अंदाजित किंमतीमध्ये वाढ होते. असे प्रसंग टाळण्याकरिता श्रीक्षेत्र भीमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडयांतर्गत विकास कामे सुरू करण्यापूर्वी भूसंपादन करणे आवश्यक असल्यास विभागीय आयुक्त, पुणे / जिल्हाधिकारी पुणे यांनी प्राधान्याने भूसंपादनाची प्रक्रिया पूर्ण करावी व भूसंपादनानंतरच अशी विकास कामे सुरू करण्यात यावीत.

४. श्रीक्षेत्र भीमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडयांतर्गत सन २०१८-१९ करीत वितरित करण्यात येत असलेला रु. १५.४० कोटी इतक्या निधीमधून वर्षभरात पूर्ण होऊ शकतील तीच कामे प्राधान्याने हाती घ्यावीत. तसेच " Thin Spreading of Financial Resources" टाळण्यासाठी उचित उपाययोजना करावी.

५. श्रीक्षेत्र भीमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडयांतर्गत सन २०१८-१९ ते सन २०२१-२२ मध्ये प्रत्येक आर्थिक वर्षात लेखाशिर्षांतर्गत होणारा प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८, तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२४५/२०१८/व्यय-८, दिनांक १८.८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३११७४००१३२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Hampayya
Date: 2018.09.01 12:01:59 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव**

तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,

विभागीय आयुक्त, पुणे

जिल्हाधिकारी, पुणे

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. राज्यमंत्री उद्योग व खणीकर्म, व पर्यावरण तथा पालकमंत्री,(पुणे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य,
८) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,
११) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे,
१२) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१४) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

------------------